जिल्हा रुग्णालय,पुणे येथील स्ट्रीट लाईन फिटींग अंतर्गत लाईट फिटींग तसेच डी.ई.आय.सी .विभागातील ८२. ५ केव्ही एडीजी सेट साठी विद्युत कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१६/ प्रक्र-३८४/ आरोग्य ३(अ)**

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ३१ जानेवारी, २०१७.

**संदर्भ:-**

१) सहसंचालक,आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे / कक्ष-३/ टे-६/ जिरुपुणेविद्युतकाम / १७९९४-९५ /१६, दिनांक-१७.१०.२०१६.

**प्रस्तावना :-**

जिल्हा रुग्णालय,पुणे येथील स्ट्रीट लाईन फिटींग, अंतर्गत लाईट फिटींग तसेच डी.ई.आय.सी. विभागातील ८२.५ केव्ही एडीजी सेट साठी विद्युत कामाच्या रु.५९,६४,५००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

जिल्हा रुग्णालय,पुणे येथील स्ट्रीट लाईन फिटींग, अंतर्गत लाईट फिटींग तसेच डी.ई.आय.सी. विभागातील ८२.५ केव्ही एडीजी सेट साठी विद्युत कामाचे अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर अंदाजपत्रकात करण्यात आलेली ४ टक्के आकस्मिक खर्च, ५ टक्के गुणनियंत्रण शुल्क व ८ टक्के सेंटेज चार्जेसची तरतूद योग्य असून, रु.५९,६४,५००/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती-:**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) बांधकाम सुरु करण्यापुर्वी सदर नकाशा वास्तुशास्त्रज्ञ, सा.बा.विभाग पुणे यांचेकडून मंजुर करुन घ्यावे.

३) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.
४) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.
५) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.
६) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.
७) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.
८) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.
९) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

जिल्हा रुग्णालय,पुणे येथील स्ट्रीट लाईन फिटींग, अंतर्गत लाईट फिटींग तसेच डी.ई.आय.सी. विभागातील ८२.५ केव्ही एडीजी सेट साठी विद्युत कामाचा खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष " ४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य), ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा. तसेच यासाठी लागणा-या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद

क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३११६०६०८८४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun V Kadam

Digitally signed by Arun V Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aecd7d3af161d56ad33a2ffe67330c25d8fa138b6856f536308a68214f53485f, cn=Arun V Kadam
Date: 2017.01.31 17:39:14 +05'30'

(अ.वि.कदम)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा)२/१-,मुंबई.नागपूर/
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
४. सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, पुणे
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
७. सहायक अभियंता श्रेणी१-,सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२,पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-पुणे
९. सार्वजनिक बांधकाम विभाग-इमा-२, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी अर्थसंक)ल्प(, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती आरोग्य ३(अ)